**दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ नुसार दिव्यांगांसाठी शासन सेवेत सुयोग्य पदांचा शोध घेण्याबाबत तज्ञ समितीची पुर्नरचना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: दिव्यांग-२०१९/प्र.क्र.२५१/दि.क.२**

मंत्रालय विस्तार, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक:- १२ नोव्हेंबर, २०२०.

<u>वाचा</u> :
१) केंद्र शासनाचा दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम,२०१६.
२) शासन परिपत्रक, क्रमांक:अपंग-२००४/प्र. क्र.५३५/सुधार-३, दिनांक २७ डिसेंबर,२००४.
३) शासन परिपत्रक, क्रमांक:अपंग-२००४/प्र. क्र.१७/अ.क.-२,दिनांक ०३ एप्रिल,२०१८.
४) सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय, क्रमांक दिव्यांग-२०१९/प्र.क्र.११४/१६-अ, दिनांक २९ मे, २०१९.
५) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. अप्रवि-२०१८/प्र.क्र.४६/आरोग्य-६, दि.१४.०९.२०१८

**<u>शासन परिपत्रक:</u>**

अपंग व्यक्ती हक्क अधिनियम,१९९५ मधील कलम ३२ नुसार संदर्भाधीन क्र.२ येथिल दिनांक २७.१२.२००४ व दि.०३.०४.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिव्यांगांसाठी शासनाचे अंगिकृत उपक्रम, महामंडळे, शासन कंपनी (शासनाच्या अधिकार क्षेत्रातील) अनुदानित संस्था, स्थानिक स्वराज्य संस्था इत्यादीच्या सुयोग्य पदांचा शोध घेण्यासाठी प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ समिती नियुक्त करण्यात आली होती. सद्य:स्थितीत दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम,२०१६ संपूर्ण देशभरात दिनांक १७.०४.२०१७ पासून लागू करण्यात आला असून अपंग व्यक्ती हक्क अधिनियम,१९९५ निरसित करण्यात आला आहे. दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम,२०१६ अन्वये दिव्यांगांच्या २१ दिव्यांग प्रवर्गाचा समावेश करण्यात आहे. ते पुढीलप्रमाणे आहेत:-

१) दृष्टीदोष (अंधत्व), २) कर्णबधीरता, ३) शारिरीक दिव्यांगता, ४) मानसिक आजार, ५) बौध्दीक दिव्यांगता (Intellectual Disability), ६) बहूदिव्यांगता (Multiple Disability), ७) शारिरीक वाढ खुंटणे (डॉर्फिझम), ८) स्वमग्नता (ऑटिझम), ९) मेंदुचा पक्षघात (सेरेब्रल पाल्सी), १०) स्नायुंची विकृती (मस्कुलर डिस्ट्राफी), ११) मज्जासंस्थेचे जूने आजार (क्रॉनिक न्युरॉलॉजिकल कंडिशन), १२) अध्ययन अक्षमता (लर्निग डिसॲबिलीटी), १३) मल्टीपल स्क्लेरॉसिस, १४) वाचा व भाषा दोष (स्पीच ॲन्ड लॅग्वेज डिसॲबिलीटी), १५) थॅलेसेमिया, १६) हिमोफिलिया, १७) सिकल सेल डिसीज, १८) ॲसीड ॲटॅक व्हिक्टीम, १९) पार्किनसन्स डिसीज, २०) दृष्टीक्षीणता (लो-व्हिजन), २१) कुष्ठरोग (लेप्रसी क्युअर्ड पर्सन्स).

तसेच कलम ३४ नुसार दिव्यांगांना शासन सेवेत ४% आरक्षणाची तरतुद करण्यात आली आहे. त्यानुसार मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्र. १३९/२००६ प्रकरणी मा उच्च न्यायालयाने दिनांक १०.१२.२०१९ रोजीच्या आदेशान्वये

शासकिय सेवेतील ४% आरक्षण विहित करण्यासाठी दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ मधील दिव्यांग प्रवर्गानुसार तज्ञ व्यक्तींचा समावेश करुन दि.२७.१२.२००४ रोजीच्या परिपत्रकान्वये गठीत तज्ञ समितीची पुनर्रचना करण्याचे निर्देश दिले आहेत.

दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ मधील कलम ३३ (२) व मा. उच्च न्यायालयाचे निर्देशानुसार या परिपत्रकान्वये तज्ञ समितीच्या स्थापनेबाबत सध्या अस्तित्वात असलेले सर्व शासन निर्णय/परिपत्रके अधिक्रमित करण्यात येत असून शासन सेवेत दिव्यांगांसाठी सुयोग्य पदांचा शोध घेण्याकरीता स्थापन करण्यात आलेल्या तज्ञ समितीचे नव्याने पुनर्रचना करण्यात येत आहे. त्यानुसार तज्ञ समितीवर खालीलप्रमाणे शासकीय सदस्य राहतील:-

| अ.क्र. | नाव/पदनाम, विभाग | | पदनाम |
|---|---|---|---|
| १. | प्रधान सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | : | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग | : | सदस्य |
| ३. | आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे | : | सदस्य |
| ४. | उपसचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | : | सदस्य |
| ५. | सहसचिव/उपसचिव (दिव्यांग कल्याण), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | : | सदस्य सचिव |
| ६. | संचालक,वैद्यकीय शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | : | सदस्य |
| ७. | संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | : | सदस्य |
| ८. | विभाग प्रमुख, मनोविकृती चिकित्सा विभाग(बौध्दीक दिव्यांगता/ऑटिझम), ग्रँट मेडीकल कॉलेज, मुंबई | : | सदस्य |
| ९. | विभाग प्रमुख नेत्र चिकित्सा विभाग (नेत्र), ग्रँट मेडीकल कॉलेज, मुंबई | : | सदस्य |
| १०. | विभाग प्रमुख, कान,नाक,घसा चिकित्सा विभाग (कर्णबधीरता), ग्रँट मेडीकल कॉलेज, मुंबई | : | सदस्य |
| ११. | विभाग प्रमुख, अस्थिव्यंग चिकित्सा विभाग (शारिरीक दिव्यांगता), ग्रँट मेडीकल कॉलेज, मुंबई | : | सदस्य |
| १२. | विभाग प्रमुख, मज्जातंतू चिकित्सा विभाग (सेरेब्रल पाल्सी), ग्रँट मेडीकल कॉलेज, मुंबई | : | सदस्य |
| १३. | विभाग प्रमुख, त्वचा विकार चिकित्सा विभाग (लेप्रसी क्युअर्ड पर्सन्स), ग्रँट मेडीकल कॉलेज, मुंबई | : | सदस्य |
| १४. | विभाग प्रमुख, औषध वैद्यकशास्त्र (मेडिसीन) (ब्लड डिसऑर्डर), ग्रँट मेडीकल कॉलेज,मुंबई | : | सदस्य |
| १५. | विभाग प्रमुख, शरीर विकृती शास्त्र, (पॅथोलॉजी) (ब्लड डिसऑर्डर), ग्रँट मेडीकल कॉलेज, मुंबई | : | सदस्य |
| १६. | संचालक, ऑल इंडिया इन्स्टिटयुट ऑफ फिजिकल मेडिसिन, हाजी अली, मुंबई. | : | सदस्य |
| १७. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ, मुंबई. | : | सदस्य |

२. उपरोक्त समिती सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत कार्यरत राहिल. सदर समितीची कार्यकक्षा संबंधित शासन विभागांकडून प्राप्त प्रस्ताव तपासून सदर पदांवर कार्य करण्यास कोणता दिव्यांग सक्षम आहे ते निश्चित करणे व त्याबाबत अंतिम निर्णय घेणे असेल. समितीने घेतलेल्या निर्णयानंतर याबाबतचा शासन निर्णय संबंधित विभागामार्फत निर्गमित करण्यात येईल. समितीचे अध्यक्ष आवश्यकतेनुसार एखाद्या व्यक्तीस, संस्थेस किंवा संबंधीत विभागाच्या अधिकाऱ्यांस बैठकीसाठी आमंत्रित करु शकतील.

३. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्थ कार्यालयातील दिव्यांगांसाठीच्या सुयोग्य पदांचा शोध घेण्याबाबत सर्व पदांचा एकत्रित प्रस्ताव उपरोक्त तज्ञ समितीच्या मान्यतेसाठी ठेवण्याकरीता सोबतच्या विवरणपत्र "अ" मधील नमुन्यात २५ प्रतीत या विभागास पाठविण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२०१११२१३३५५७७४२२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINGLE DINESH RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032, street=151 ANNEX,1ST FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fc344849650ce07c3f9adc7e2cd4976b2852065e2acd65f7ce e1828c10091458, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DINGLE DINESH RAMCHANDRA
Date: 2020.11.12 13:39:46 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उप मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.राज्य मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. मा.विधानसभा/विधानपरिषद सर्व सदस्य,
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
९. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव,सामाजिक न्याय, सा.न्या. व वि.स.विभाग,मंत्रालय,मुंबई,
११. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग,महाराष्ट्र शासन, मुंबई,
१२. आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३. सहसचिव (दिव्यांग कल्याण), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई,
१४. सह/उप सचिव, (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. सह/उपसचिव, आस्थापना, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. समितीचे संबंधित सर्व सदस्य (दिव्यांग कल्याण आयुक्तालयामार्फत)
१७. निवडनस्ती (दिव्यांग कल्याण -२).

## विवरणपत्र "अ"

राज्य शासनाच्या सेवेतील शासकीय/निमशासकीय कार्यालयांच्या आस्थापनावरील पदांची दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ व सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२९.०५.२०१९ रोजीच्या शासन निर्णयानुसार पदसुनिश्चिती करणेबाबतचा नमुना.

| अ.क्र | पदनाम | शारिरीक पात्रता | दिव्यांग प्रवर्ग | सदर पदांची जबाबदाऱ्या व कर्तव्ये | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |